**अमरावती जिल्हयामधील वरुड तालुक्यातील सन १९९१ मधील अतिवृष्टी / पुरामुळे बाधित २६ पूर पुनर्वसित गावांमध्ये सिमेंट कॉंक्रीट नाली बांधकाम या नागरी सुविधा कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - एफएलडी-२०२०/प्र.क.२९/र-१२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक- २८ फेब्रुवारी, २०२३

वाचा -

१) महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र.सीएफएल ५९९१/सीआर ६०८(२)/म-३, दि.१२/०८/१९९१
२) महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र.जीटीएल/एफएलडी-१०९१/प्र.क्र.१३२६/र-१२, दि.७/१२/१९९१
३) महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र.जीटीएल/एफएलडी-१०९१/प्र.क्र.१३२६/र-१२, दि.२१/०४/१९९२
४) महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र.आरपीए-२००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.०१/०८/२००९
५) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७/०४/२०१५
६) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि. १९/०१/२०१६
७) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र. उपआ/पुनर्व/भूसं-१/म.स./कावि २२०/२०२२, दि.१७/११/२०२२

प्रस्तावना

अमरावती व नागपूर जिल्हयातील सन जुलै १९९१ मध्ये अतिवृष्टीमुळे वर्धा नदीला महापूर आला होता. त्यामध्ये बाधित झालेल्या कुटूंबाचे पुनर्वसन करण्यासाठी शासनाकडून दि.२१/४/१९९२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यानूसार पुनर्वसित भागात नागरी सुविधा कामांना संदर्भ क्र.८ च्या विभागीय आयुक्त, अमरावती यांनी वरुड तालुक्यातील २६ पुनर्वसित गावांच्या सिमेंट कॉंक्रीट नालीचे बांधकाम या नागरी सुविधा कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याचा प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय

**अमरावती जिल्हयामधील वरुड तालुक्यातील २६** पूर पुनर्वसित गावांतील सिमेंट कॉंक्रीट नालीचे बांधकाम या नागरी सुविधा कामांच्या एकूण रु.**२३,२७,८५,४४६**/-लक्ष (**अक्षरी तेवीस कोटी सत्तावीस लक्ष पंच्याऐंशी हजार चारशे शेहचाळीस फक्त)** इतक्या रक्कमेच्या खालील २६ अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ क्र | ता. वरुड, जि. अमरावती येथील पूर बाधित गावाचे नाव | नागरी सुविधा काम | अंदाजपत्रकातील रक्कम |
|---|---|---|---|
| १ | आमनेर | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | ९०,५७,२८४.०० |
| २ | देऊतवाडा | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | ९०,४१,८२०.०० |
| ३ | वघाळ | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | १,०६,५७,२७९.०० |
| ४ | पोरगव्हाण | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | ४५,९०,९०१.०० |
| ५ | मोशी खुर्द | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | ७१,०५,४९०.०० |
| ६ | वेढापूर | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | २४,१९,०२८.०० |
| ७ | उदापूर | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | ४०,४८,८२३.०० |
| ८ | घोराड | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | २१,११,१८७.०० |
| ९ | चिंचरगव्हाण | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | ५३,१२,२८०.०० |
| १० | मोरचुंद | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | २३,३७,४७५.०० |
| ११ | वाडेगांव | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | ४६,६०,९९६.०० |
| १२ | गाडेगांव | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | ८४,००,०४८.०० |
| १३ | वाठोड | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | ५८,०२,१८२.०० |
| १४ | खानापूर | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | ८,४९,५७०.०० |
| १५ | कुरळी | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | ६६,९२,३१५.०० |
| १६ | पवनी | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | ७,९३,६९०.०० |
| १७ | सावंगी | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | १,९८,३२,४०६.०० |
| १८ | वंडली | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | ८३,३४,८५०.०० |
| १९ | चांदस | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | १८,१९,५६५.०० |
| २० | लिंगा | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | १,८९,३९,७७४.०० |
| २१ | सुरळी | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | ९७,८२,०४३.०० |
| २२ | मालखेड | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | ५३,६६,००२.०० |
| २३ | अमडापूर | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | ६८,८४,८६१.०० |
| २४ | पुसला | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | ३,१८,३८,७२१.०० |
| २५ | शहापूर | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | २,६७,९५,८७३.०० |
| २६ | गणेशपूर | सिमेंट काँक्रीट नालीचे बांधकाम | १,९३,१०,९८३.०० |
| | **एकूण** | | **२३,२७,८५,४४६.००** |

**अटी व शर्ती :-**

१) नागरी सुविधा कामे करताना प्रस्तुत प्रस्तावित समाविष्ट असलेले गौण खनिज स्वामीत्वधनाची वसूली करण्याची जबाबदारी संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेची राहील.

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. जीटीएन १०८३ /२१७/र-१२, दि.१०-०२-१९८३, शासन निर्णय क्र. आरसीपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१-०८-२००९ व शासन परिपत्रक क्र. आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८-०३-२०११ अन्वये पुनर्वसित/ विस्तारित गावठाणातील नागरी सुविधा पुरविण्यासाठी निर्धारित करण्यात आलेल्या भौतिक मानकांनुसार काम करुन घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील.

३) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांवर होणारा खर्च मंजूर अंदाजपत्रकांतील रकमेपेक्षा अधिक होणार नाही तसेच सदर नागरी सुविधेचे काम पुर्ण होईपर्यंत त्या नागरी सुविधेचा खर्च वाढणार नाही, ही बाब लक्षात घेऊन नागरी सुविधेचे कामे तातडीने पूर्ण करण्याची संबंधित अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी योग्य ती दक्षता घ्यावी.

४) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांसाठीच्या अंदाजपत्रकांत दर्शविलेली कामनिहाय रक्कम तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेतील अटींचे विहित कार्यपध्दतीनुसार पालन होईल, याची संबंधित कार्यान्वयन यंत्रणेच्या संबंधित मुख्य अभियंता, अधिक्षक अभियंता व संबधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

५) संबंधित संबंधित मुख्य अभियंता, अधिक्षक अभियंता व संबधित कार्यकारी अभियंता यांनी प्रस्तावाधीन नागरी सुविधा सर्व दृष्टीने पूर्ण झाल्यावर व त्याप्रमाणे जिल्हाधिकारी, अमरावती यांचेकडून प्रमाणपत्र घेतल्यानंतर संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेकडे / जिल्हा परिषदेकडे तात्काळ हस्तांतरणाची कार्यवाही करावी व तत्संबंधात जिल्हाधिकारी, अमरावती यांचेमार्फत अनुपालन अहवाल शासनाच्या पुनर्वसन विभागास सादर करावा.

६) महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम विभाग कार्य नियमावलीतील प्रचलित नियमांनुसार सदर नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांस संबंधित कार्यान्वयन यंत्रणेच्या मुख्य अभियंता/कार्यकारी अभियंता यांनी तांत्रिक मान्यता प्रदान केलेली असावी.

७) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामे यापूर्वी अन्य कोणत्याही योजनेतून करण्यात आलेली नाहीत. अथवा सदरची कामे अन्य योजनेत समाविष्ट नाहीत, तसेच या कामांवर यापूर्वी खर्च करण्यात आलेला नाही, याबाबत प्रकल्प यंत्रणेने खात्री केलेली असावी.

८) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांचा उचित / उच्च दर्जा राखला जाईल, याची संबंधित मुख्य अभियंता / अधिक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी योग्य ती दक्षता घ्यावी.

९) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम, अमरावती यांनी प्रस्तुत प्रशासकीय मान्यता आदेशांतील अटींची पूर्तता प्रचलित प्रक्रिया पूर्ण करुन प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया तात्काळ सुरु करावीत. तसेच निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर निविदा प्राप्त कामांसाठीचे कार्यारंभ आदेश देऊन नागरी सुविधांची कामे तात्काळ सुरु करावीत

२. उपरोक्त नागरी सुविधा कामावरील खर्च " **मागणी क्रमांक सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य-०२ पूर, चक्रीवादळे इत्यादि, १०१, अनुग्रह सहाय्य (९३) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९३)(०५) पुरामुळे बाधित झालेल्या व्यक्तिंच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणी पुरवठा, शाळा चावडी, विदयुत पुरवठा, नागरी सुविधावरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५ ०९८८) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)"** या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीमधून करण्यात येईल.

३. संबंधित कार्यान्वयन यंत्रणेच्या मुख्य अभियंता / अधिक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम, अमरावती यांनी उपरोक्त लेखाशिर्षाखाली निधी उपलब्ध आहे, याची खात्री करुन नागरी सुविधा कामांचे कार्यारंभ आदेश द्यावेत. सदरची नागरी सुविधांची कामे निधी उपलब्ध करुन

देण्यात आलेल्या आर्थिक वर्षात पूर्ण करण्याची जबाबदारी संबंधित मुख्य अभियंता / कार्यकारी अभियंता यांची राहील. सदरच्या सुविधा कामांसाठी वितरीत करण्यात आलेल्या निधी ज्या कामासाठी उपलब्ध करुन दिला जाईल त्याच कामासाठी त्याचा विनियोग करण्यात यावा, ही बाब काटेकोरपणे पाळावी. सदरच्या नागरी सुविधा कामांसाठी वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने उपयोजन प्रमाणपत्रे (Utilisation Certificates) प्राथम्याने सादर करावीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२८१२१६१९६६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHULARAM R NIKHARE

Digitally signed by CHULARAM R NIKHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=888a9197d5a4831c7e5ef0c4328259521ba94feaafdffbadf353be3592552a31, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E37123E923CF43F99F06B54384FF491E5F703F14D653B5A59D47EAB1F73E2597, cn=CHULARAM R NIKHARE
Date: 2023.02.28 12:20:13 +05'30'

**(चु. रा. निखारे)**
**कार्यासन अधिकारी, महसुल व वन विभाग**

**प्रत**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) अमरावती विभाग, अमरावती.
२. उप आयुक्त (पुनर्वसन ), अमरावती विभाग, अमरावती
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, अमरावती
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती.
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई -१ / नागपूर-२ (२ प्रतीत).
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई -१ / नागपूर-२ (२ प्रतीत).
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
९. वित्त विभाग,कार्यासन व्यय ९/ व्यय १०/ अर्थसंकल्प - ६, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. कार्यासन अधिकारी, कार्यासन ब-१/ पी.ए.सी. / म-११, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११. निवड नस्ती, कार्यासन र-१२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मंबई ४०० ०३२.